**प्राध्यापक, उपकरणीकरण शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावरील नियुक्तीचे आदेश रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१२/प्र.क्र.(९०/२०१३)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक -:०३ एप्रिल, २०१७

**<u>पहा</u>** : शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१२/प्र.क्र.( ९०/२०१३), दि. १६/०४/२०१६

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार प्राध्यापक, उपकरणीकरण शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर श्रीमती राजश्री प्रभाकरराव सुभेदार, यांची शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर येथे संदर्भाधीन आदेशाद्वारे त्या ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्वीकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्रीमती सुभेदार यांनी आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत म्हणजेच दि. १५.०५.२०१६ पर्यंत रूजू होणे अभिप्रेत होते. श्रीमती सुभेदार यांनी त्यांच्या दि. १०.०५.२०१६ च्या पत्रान्वये सदर पदावर ०३ महिने मुदतवाढ देण्यासंदर्भात केलेली विनंती शासनाच्या दि. १४/१०/२०१६ रोजीचे पत्रान्वये अमान्य करण्यात आली आहे. तथापि, श्रीमती सुभेदार ह्या सदर पदावर रूजू न झाल्याने त्यांची नियुक्ती रद्द करण्यासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यापूर्वी दि. ३० /११/ २०१६च्या पत्रान्वये सदर पदावर रुजू होण्यासाठी अखेरची संधी म्हणून श्रीमती सुभेदार यांना दि. ०९.१२.२०१६ पर्यत अंतिम मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि श्रीमती सुभेदार हया सदर पदावर अद्यापही रुजू झालेल्या नाहीत. यावरुन त्यांना सदरच्य नियुक्तीमध्ये स्वारस्य नसल्याचे दिसून येते. त्यामुळे श्रीमती सुभेदार यांच्या सदर पदावरील नियुक्तीबाबतचे आदेश रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

श्रीमती राजश्री प्रभाकरराव सुभेदार यांची प्राध्यापक, उपकरणीकरण शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर येथे संदर्भाधीन आदेशान्वये करण्यात आलेली नियुक्ती या आदेशाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४०३१६१५०५६९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.04.03 16:16:53 +05'30'

**( सुधिर ज. शेट्टी )**
कार्यासन आधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

श्रीमती राजश्री प्रभाकरराव सुभेदार, प्लॉट नं. ५९ “विश्वनाथ”,
छत्रपतीनगर, पूर्णा रोड, नांदेड-४३१ ६०२.

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, नागपूर.
६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र -२ नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
९. निवड नस्ती/तांशि-१.